**कंधार किल्ला, ता. कंधार, जि. नांदेड या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
**शासन निर्णय क्रमांक : स्मारक-२०२४/प्र.क्र.८५/सां.का.३**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १२ मार्च, २०२४.

वाचा :- संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.स्मारके/२०२४/७९६, दि.२७ फेब्रुवारी, २०२४

प्रस्तावना :-

नांदेड जिल्हयाच्या ठिकाणा पासून ५५ कि. मी. अंतरावर कंधार किल्ला असून उत्तर, दक्षिण व पश्चिम अशा तिन्ही बाजूने नैसर्गिक टेकड्यांनी वेढलेला हा भूभाग मन्याड नदीच्या काठी आहे. हा किल्ला कंधार मानसपूरी, बहादरपूरा गावाच्या सरहद्दीवर आहे. कंधार किल्ला कोणी बांधला याबाबत मतभेद असले, तरी राष्ट्रकुट राजा कृष्ण तिसरा यांच्या काळात कंधार किल्याचा विस्तार झाला, असे ऐतिहासीक कागदपत्रात उल्लेख आहे. किल्ल्यास नवीन तटबंदी उभारली गेली व किल्ल्याभोवती खंदक खोदला गेला असा उल्लेख आढळतो. राष्ट्रकुटांच्या अस्तानंतर हा किल्ला काकतियांच्या प्रभावाखाली आला. इ.स. १३०७ च्या सुमारास मलिक काफूर याने हा किल्ला जिंकला. पुढे इ.स. १३२७ मध्ये महम्मद तुघलकाने किल्ल्याचा ताबा मिळवला. कंधार हे त्याचे महत्वाचे लष्करी ठाणे होते. किल्ल्याच्या सुरक्षतेकरिता किल्ल्याभोवती १८ फूट खोलीचा खंदक आहे. किल्ल्याला दुहेरी तटबंदी असून प्रवेशद्वार उत्तर दिशेला आहे. किल्ल्याला १६ बुरुज बसून अनेक दरवाजे आहेत. यात शाह, धन अंबरी, महाकाल, लक्ष्मण, बालाहिसार, नांदेडी इ. प्रमुख बुरुज आहेत. किल्ल्यात रंगमहाल, शीश महल, दरबार महल अशा अनेक मध्ययुगीन इमारती असून, त्यावरील पर्शियन शिलालेखांमधून त्यांची माहिती मिळते. कंधार किल्ल्याची महती सांगणारे विविध काळातील देवनागरी, संस्कृत, अरबी, फारसी भाषांमधील लहानमोठे एकूण २२ शिलालेख किल्ल्यात आहेत. सद्यस्थितीत स्मारक परिसरात मोठ्या प्रमाणात झाडेझुडपे वाढल्यामुळे पर्यटकांना स्मारक परिसरातील वास्तू पाहण्याकरिता अडचणी येत आहेत. किल्ल्याच्या खंदकाच्या भितीची मोठ्या प्रमाणात हानी होऊन क्षती झालेली आहे. या सर्व बाबींचा विचार करता कंधार किल्ला, ता. कंधार, जि. नांदेड या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाचे मे. तेजस्विनी आफळे असोशिएट्स यांनी तयार केलेले रु.२,६९,०७,९४७/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी मान्यतेस्तव सादर केले आहे. त्यानुसार या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :-

कंधार किल्ला, ता. कंधार, जि. नांदेड या राज्य संरक्षित स्मारकाच्या जतन दुरुस्ती कामाच्या रु.२,६९,०७,९४७/- (अक्षरी रुपये दोन कोटी एकोणसत्तर लक्ष सात हजार नऊशे सत्तेचाळीस मात्र) (वस्तु व सेवाकरासह) या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर निधी मागणी क्र. झेडडी-०२, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, २२०५ कला व संस्कृती (००) १०३, पुरातत्वशास्त्र, (०१) (०६) राज्यातील ऐतिहासिक व सांस्कृतिकदृष्ट्या महत्वाचे किल्ले व धार्मिक स्थळे यांची जपणूक संरक्षण (कार्यक्रम) (२२०५ १३०२) २७ लहान बांधकामे या लेखाशिर्षातील त्या त्या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/मानकानुसार पूर्ण होईल हे पाहण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची राहील.

०४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) “अ” नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१५३९३३९२२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT,
2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.12 15:48:53 +05'30'

**( नंदा राऊत )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मंत्री (सां.का.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहायक संचालक, पुरातत्व विभाग, नांदेड.

महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
जिल्हा कोषाधिकारी, नांदेड.
कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती, सां.का.३.